**शुध्दीपत्रक -**
**ग्रामीण यात्रास्थळ विकास योजनेंतर्गत "ब" वर्ग ग्रामीण तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी करण्यात येणाऱ्या विकास कामांची यंत्रणा बदलणे बाबत.**

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः तीर्थवि-२०२४/प्र.क्र.१०५/यो-११**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई ४०० ००१

**दिनांक: १४ ऑगस्ट, २०२४**

**संदर्भ**:- ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्र. तीर्थवि-२०२३/प्र.क्र.२७१/यो-११ दि.१३.०३.२०२४.

प्रस्तावना :-

संदर्भिय शासन निर्णयान्वये वाशिम जिल्हयातील (१) कानिफनाथ (कान्होबा संस्थान) सावरगाव,ता.मंगरूळपीर, (२) श्रीक्षेत्र भायजी महाराज संस्थान मौजे पिंपळखुटा ता.मंगरूळपीर, (३) श्री.भवानी माता (जगदंबामाता संस्थान) मौजे पारवा ता.मंगरूळपीर, या "ब" वर्ग प्राप्त ग्रामीण तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी विविध विकास कामांसाठी तीर्थक्षेत्रनिहाय स्वतंत्र शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देऊन प्रशासकीय मान्यतेच्या १०% निधी प्रथम टप्प्यात मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,वाशिम यांना वितरीत करण्यात आला होता. सदर तीर्थक्षेत्रांच्या विकास कामांची यंत्रणा बदल करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन शुध्दीपत्रक:-**

संदर्भीय शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या (१) कानिफनाथ (कान्होबा संस्थान) सावरगाव,ता.मंगरूळपीर, ( २) श्रीक्षेत्र भायजी महाराज संस्थान मौजे पिंपळखुटा ता.मंगरूळपीर, (३) श्री.भवानी माता (जगदंबामाता संस्थान) मौजे पारवा ता.मंगरूळपीर, जि.वाशिम या "ब" वर्ग प्राप्त ग्रामीण तीर्थक्षेत्रांच्या विकास कामांची यंत्रणा **जिल्हा परिषद,वाशिम** ऐवजी "**सार्वजनिक बांधकाम विभाग, वाशिम**" अशी सुधारित करण्यात येत आहे. यामुळे संदर्भीय शासन निर्णयात ज्या ठिकाणी "मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम" असे नमूद केले आहे, त्याठिकाणी "कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, वाशिम" असे वाचण्यात यावे.

२. उपरोक्त तीन तीर्थक्षेत्रांना संदर्भिय शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देऊन प्रथम टप्यात वितरीत करण्यात आलेला १०% निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,वाशिम यांनी "कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, वाशिम" यांना हस्तांतरित करावा.

३. उपरोक्त तीन तीर्थक्षेत्रांबाबत संदर्भीय शासन निर्णयात नमूद अन्य अटी व शर्ती कायम असल्याने त्यानुसार पुढील कार्यवाही करण्यात यावी.

४. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८१४१३१६२९९५२० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2024.08.14 13:34:21 +05'30'

**(का. गो. वळवी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य मलबार हिल, मुंबई.
२) मा. मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
४) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
५) विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, छ.संभाजीनगर विभाग, अमरावती.
६) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, वाशिम.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम.
८) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम.
१०) नियोजन विभाग, (का-१४४४) मंत्रालय, मुंबई-३२.
११) वित्त विभाग (व्यय १५, अर्थसं १६, अर्थसं १७) मंत्रालय,मुंबई ३२.
१२) कार्यासन क्र.वित्त-७, वित्त-१, वित्त-८, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवड नस्ती (का.यो-११), ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.